GR-200406251615560001-0100

**अनुसूचित जमातीच्या राखीव जागांवर दिनांक १५ जून, १९९५पूर्वीच सरळ सेवेने नियुक्त अथवा पदोन्नत झालेल्या विशेष मागास प्रवर्गातील कर्मचारी / अधिकारी यांची शासकीय /निमशासकीय सेवेतील जेष्ठता निश्चित करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक : बीसीसी - २००४/प्र.क्र.४५/०४/१६-ब

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

**दिनांक : २४ जून, २००४**

**पहा** .- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी -१०९४/ प्र.क्र ६८/९४/१६ब, दिनांक १५ जून १९९५

२)शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी -१०९४/ प्र.क्र ६८/९४/१६ब, दिनांक २४ जुलै. १९९८

३)शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी -१०९४/ प्र.क्र ६८/९४/१६ब, दिनांक २७ मे २००२.

**प्रस्तावना :-** अनुसूचित जमातीच्या यादीमध्ये ज्या जमातींचा समावेश करण्यात आलेला आहे अशा जमातींच्या नावाशी साधर्म्य असणा-या गोवारी,माना,कोष्टी,कोळी, मुन्नेरवार,या सारख्या जातींचा **विशेष मागास प्रवर्ग** म्हणून समाज कल्याण ,सांस्कृतिक कार्य ,क्रिडा विभाग, यांनी त्यांच्या क्रमांक -सीबीसी -१४९४/प्र.क्र.२३६/मावक -५, दिनांक ७ डिसेंबर १९९४ च्या शासन निर्णयान्वये घोषित केलेला आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक- बीसीसी १०९४/प्र.क्र. ६८/९४/१६ब, दिनांक १५ जून १९९५ अन्वये विशेष मागास प्रवर्गासाठी सरळ सेवा व पदोन्नतीमध्ये २% आरक्षण विहीत करण्यात आले आहे. तसेच या विशेष मागास प्रवर्गातील ज्या व्यक्तींना दिनांक १५ जून १९९५ पूर्वी अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासकीय / निमशासकीय सेवेत प्रवेश मिळवून पदोन्नती प्राप्त केलेली आहे त्यांना पदावनत किंवा सेवेतून काढून टाकण्यात येवू नये अशा प्रकारचे संरक्षण दि.१५ जून १९९५ च्या शासन निर्णयान्वये दिलेले आहेत.

दिनांक १५ जून १९९५ च्या शासन निर्णयानुसार विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना सेवेतील संरक्षण देण्याबाबत वरील प्रमाणे निर्णय घेतला असला तरी असे संरक्षण प्राप्त केलेल्या कर्मचारी / अधिकारी यांना त्यांच्या संरक्षित केलेल्या संवर्गातील ज्येष्ठता कशा प्रकारे विचारात घ्यावी याबाबत

निर्णय घेण्यात आलेला नव्हता. या अनुषंगाने श्री.एस.ए.कंदिकटला विरुध्द महाराष्ट्र शासन प्रकरणी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण , मुंबई यांच्यासमोर दाखल झालेल्या मूळ अर्ज क्रमांक ३९८/२००१ प्रकरणी, दिनांक १५ जून १९९५ च्या शासन निर्णयात ज्या व्यक्तींना सेवेतील संरक्षणाचा फायदा देण्यात आलेला आहे तो फायदा त्या संवर्गातील त्यांची जेष्ठता संरक्षित करण्यासाठीही आहे असे स्पष्टपणे नमूद करणारे आदेश निर्गमित करण्याबाबत न्यायाधिकरणाने निर्णय दिलेला आहे. न्यायाधिकरणाचे आदेश विचारात घेवून दिनांक १५ जून १९९५ च्या शासन निर्णयानुसार सेवेत संरक्षण प्राप्त केलेल्या विशेष मागास प्रवर्गातील अधिकारी / कर्मचा-यांची सेवा जेष्ठता निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या अनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

विशेष मागास प्रवर्गातील ज्या अधिकारी / कर्मचारी यांनी दिनांक १५ जून १९९५ पूर्वीच अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे शासकीय / निमशासकीय सेवेत प्रवेश मिळविला असेल अथवा पदोन्नती प्राप्त केलेली असेल अशा अधिकारी / कर्मचा-यांना उपरोक्त क्रमांक १ येथील दिनांक १५ जून १९९५ च्या शासन निर्णयाद्वारे संरक्षण देवून अशा संरक्षित केलेल्या अधिकारी/ कर्मचा-यांची सेवा ज्येष्ठता **दिनांक १५ जून १९९५** अशी विचारात घेण्यात यावी.

२. मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या वरील आदेश निदर्शनास आणून निर्णयाच्या आदेशाप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना विनाविलंब देण्यात याव्यात .

३. हे आदेश शासकीय / निमशासकीय सेवा , मंडळे / महामंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषदा अनुदानित शैक्षणिक संस्था , सहकारी संस्था, शासनाचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम इत्यादी कार्यालयांना लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( यु.प्री.एस.मदान )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

म.राज्यपाल यांचे सचिव
म.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव